**प्रादेशिक सरस-२०१०-११ च्या कालदर्शिकेनुसार प्रादेशिक सरस प्रदर्शनासाठी राज्य समन्वय अधिकाऱ्यांची नेमणूक व विभागीय सरस प्रदर्शनामध्ये जिल्ह्यांच्या सहभागाबाबत.**

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन परिपत्रक क्र. सरस-२०१०/प्र.क्र. ८७ / योजना-१
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२. दि. १७ जून, २०१०,

**परिपत्रक :-**

केंद्र शासनाने दिनांक १/४/१९९९ पासून सुरू केलेल्या **"स्वर्ण जयंती ग्राम स्वरोजगार योजना"** या दारिद्रय निर्मुलनाच्या योजने अंतर्गत दारिद्रय रेषेखालील कुटुंबाना बँकांचे कर्ज व शासकिय अनुदान देऊन स्वयंरोजगाराचे साधन उपलब्ध करून देऊन त्यांना दारिद्रय रेषेच्या वर आणण्याचा प्रयत्न केंद्र शासनाने सुरू केलेला आहे. सदर योजने अंतर्गत स्थापित करण्यात आलेल्या बचत गटांनी / वैयक्तिक स्वरोजगारी लाभार्थ्यांनी उत्पादित केलेल्या वस्तुंना बाजारपेठ उपलब्ध व्हावी या हेतुने केंद्र शासन व राज्य शासन यांच्या संयुक्त विद्यमाने सन २००३ पासून केंद्र शासनाने महाराष्ट्र राज्यासह विविध राज्यांमधून विभागीय सरस प्रदर्शन सुरू केले आहे. विविध राज्यातील सरस प्रदर्शनासाठी शासनामार्फत राज्य समन्वय अधिकाऱ्यांची नेमणूक केली जाते. काही राज्यांकडून प्रादेशिक सरस विक्री प्रदर्शनामध्ये सहभागी होण्याबाबतचे निमंत्रण अगदी आयत्या वेळेस मिळते (सुमारे १० ते १५ दिवस अगोदर मिळते) त्यामुळे सर्व जिल्ह्यांशी संपर्कसाधून राज्याचे समन्वय करण्यासाठी इच्छुक असलेल्या राज्य समन्वय अधिकाऱ्याची नेमणूक करणे कठीण होते. **तसेच, अल्प कालावधीची सूचना मिळाल्यामुळे इतर राज्यामध्ये सरस प्रदर्शनासाठी सहभागी होण्यासाठी बचत गटांचा अल्प प्रतिसाद मिळतो.**

२. सन २०१०-११ या वर्षात विविध राज्यात आयोजित केल्या जाणाऱ्या प्रादेशिक सरस प्रदर्शनाची कालदर्शिका शासनास प्राप्त झाली आहे. सदर कालदर्शिकेनूसार विविध राज्यातील सरस प्रदर्शनासाठी राज्य शासन सोबत जोडलेल्या **प्रपत्र "अ"** नुसार **राज्य समन्वयक जिल्ह्याची** नेमणूक करीत आहे. **प्रपत्र"अ"** मधील रकाना ५ मध्ये नमूद जिल्ह्यातील संबंधित मुख्य कार्यकारी अधिकाऱ्यांनी जिल्ह्यातील संबंधित कालावधीतील कार्यबाहुल्यानुसार प्रकल्प संचालक किंवा कार्यक्षम सहाय्यक प्रकल्प अधिकारी यांची राज्य समन्वय अधिकारी म्हणून निवड करावयाची आहे. **तथापि सदर नेमणूक करताना कोणत्याही परिस्थितीत सहाय्यक प्रकल्प अधिकारी पेक्षा कमी दर्जाचा अधिकारी राज्य समन्वयक अधिकारी म्हणून नेमण्यात येऊ नये.** प्रदर्शनामधील सहभागाबाबतच्या सविस्तर मार्गदर्शक सूचना सोबतच्या **प्रपत्र "ब"** मध्ये देण्यात आल्या आहेत.

३. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी तथा अध्यक्ष, कार्यकारी समिती जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यांनी आपल्या जिल्ह्यातील उत्कृष्ट उत्पादन असणाऱ्या बचत गटांची यादी तयार करून प्रादेशिक सरस प्रदर्शनामध्ये जास्तीतजास्त सहभागी होण्यासाठी आपल्या स्तरावर कालदर्शिकेप्रमाणे सन २०१०-११ चे नियोजन करावे.

सदर परिपत्रक शासनाच्या वेबसाईट वर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०१००६१७१४४१०९००१ हा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(अविनाश सुभेदार)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रत,

१. विभागीय आयुक्त, कोकण / पुणे/ नाशिक/ औरंगाबाद/ अमरावती/ नागपूर विभाग.
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष, कार्यकारी समिती जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा (सर्व).
३. उप आयुक्त (विकास), कोकण / पुणे/ नाशिक/ औरंगाबाद/ अमरावती/ नागपूर विभाग.
४. प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, (सर्व)
५. जिल्हा कोषागार अधिकारी, (सर्व)
६. कार्यासन अधिकारी योजना-३, योजना-५, योजना-२.
७. निवड नस्ती योजना-१.

परिपत्रक क्र. सरस-२०१०/प्र.क्र. ८७ / योजना-१
दिनांक   १७ जून,२०१० चे सहपत्र.

## प्रपत्र "अ"

| अनु क्र. | राज्य | प्रदर्शनाचे ठिकाण | तारीख व महिना | राज्य समन्वयक जिल्ह्याचे नांव |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | | ५ |
| १ | हिमाचल प्रदेश | चंबा | २२.०७.२०१० ते ०५.०८,२०१० | सांगली |
| २ | जम्मु आणि काश्मिर | श्रीनगर | ०१.०८.२०१० ते १२.०८.२०१० | रत्नागिरी |
| ३ | केरळ | कोची | १३.०८.२०१० ते २२.०८.२०१० | रायगड |
| ४ | हरियाना | गुरगांव | १६.०९.२०१० ते २९.०९.२०१० | बीड |
| ५ | आसाम | गोहाटी | ३०.०९.२०१० ते १२.१०.२०१० | यवतमाळ |
| ६ | उत्तराखंड | डेहराडून | ०१.१०.२०१० ते १२.१०.२०१० | नागपूर |
| ७ | आंध्र प्रदेश | हैद्राबाद | ०७.१०.२०१० ते २१.१०.२०१० | औरंगाबाद |
| ८ | नवी दिल्ली | दिल्ली हाट, पितमपुरा | ०९.१०.२०१० ते २४.१०.२०१० | वर्धा |
| ९ | मणीपूर | इंफाळ | २१.१०.२०१० ते ०१.११.२०१० | परभणी |
| १० | नवी दिल्ली | प्रगती मैदान (IITF Saras) | १४.११.२०१० ते २७.११.२०१० | नाशिक |
| ११ | बिहार | पाटणा | ०२.१२.२०१० ते १३.१२.२०१० | अहमदनगर |
| १२ | कर्नाटक | हुबळी | ०९.१२.२०१० ते २०.१२.२०१० | सोलापूर |
| १३ | राजस्थान | जयपूर | १६.१२.२०१० ते २७.१२.२०१० | जळगांव |
| १४ | पश्चिम बंगाल | कोलकाता | १६.१२.२०१० ते २७.१२.२०१० | भंडारा |
| १५ | त्रिपुरा | आगरतळा | ०३.०१.२०११ ते १०.०१.२०११ | चंद्रपूर |
| १६ | ओरीसा | भुवनेश्वर | ०६.०१.२०११ ते १६.०१.२०११ | गडचिरोली |
| १७ | नवी दिल्ली | दिल्ली हाट INA | ०७.०१.२०११ ते २०.०१.२०११ | पुणे |
| १८ | **महाराष्ट्र** | **मुंबई** | २०.०१.२०११ ते ०३.०२.२०११ | **राज्य शासन / ठाणे** |

परिपत्रक क्र. सरस-२०१०/प्र.क्र. ८७/ योजना-१
दिनांक:- १७ जून,२०१० चे सहपत्र

## प्रपत्र "ब"

## प्रादेशिक सरस प्रदर्शनामध्ये सहभागी होणाऱ्या जिल्ह्याकरिता सूचना

१. प्रादेशिक सरस प्रदर्शनासाठी राज्य शासनाने नेमून दिलेल्या समन्वयक जिल्ह्यातील मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष, कार्यकारी समिती जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यांनी सदर प्रदर्शनासाठी जिल्ह्यातील संबंधित कालावधीतील कार्यबाहुल्यानुसार प्रकल्प संचालक किंवा कार्यक्षम सहाय्यक प्रकल्प अधिकारी यांची राज्य समन्वयक अधिकारी म्हणून निवड करुन राज्य शासनाकडे **किमान १ महिना अगोदर ( नाव, पदनाम, दूरध्वनी क्रमांक (ऑफीस, निवास व मोबाईल नं.), फॅक्स क्रमांक इत्यादी तपशीलासह)** पाठवावी.

२. समन्वयक जिल्ह्यातून राज्य समन्वयक अधिकाऱ्यासोबत **केवळ एक सहाय्यक राज्य समन्वयक अधिकारी** (विस्तार अधिकारी दर्जाचा पाठवावा.)

३. समन्वयक जिल्ह्याव्यतिरिक्त इतर जिल्ह्यांनी विविध प्रादेशिक सरस प्रदर्शनासाठी आपल्या जिल्ह्यातील उत्कृष्ट उत्पादन असणाऱ्या व सहभागी होऊ इच्छिणाऱ्या बचत गटांची यादी (सहभागी होणारे स्वयंसहायता गटाचे/ कारागिरांचे नाव, उत्पादनाचा प्रकार, मालाची किंमत इत्यादी माहिती **<u>केंद्र शासनाच्या विहित प्रपत्रात</u>** भरुन) संबंधित समन्वयक जिल्ह्याकडे प्रादेशिक सरस प्रदर्शनापूर्वी **किमान १ महिना अगोदर** पाठवावी. **केंद्र शासनाच्या विहित प्रपत्रात माहिती पाठविताना ती प्रकल्प संचालकांच्याच स्वाक्षरीने प्रमाणीत करून पाठवावयाची आहे. प्रकल्प संचालकांच्या वतीने "करिता " म्हणून स्वाक्षरी करून विहित प्रपत्रातील माहिती पाठविण्यात येऊ नये.**

४. समन्वयक जिल्ह्याने संबंधित प्रदर्शनापूर्वी **१० दिवस अगोदर** प्रदर्शनात सहभागी होऊ इच्छिणाऱ्या बचत गटांची यादी **राज्य शासनाकडे माहितीसाठी** पाठवावी. तसेच राज्याकरीता आरक्षित गाळ्यांच्या संख्येच्या दुप्पटी इतकेच बचत गट प्रदर्शन स्थळी नेण्यात यावेत, जेणेकरून बचतगटांना त्यांच्या मालाची मांडणी व विक्री परिणामकारकरित्या करता येऊ शकेल.

५. **सर्व जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांनी बचत गटांची शिफारस करताना कोणताही बचत गट २ पेक्षा जास्त वेळ प्रादेशिक सरस प्रदर्शनात सहभागी होणार नाही याची दक्षता घ्यावी.**

६. प्रदर्शनामध्ये सहभागी होणारे कारागिर हे दारिद्र्य रेषेखाली स्वयं सहाय्यता गटातील व स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार योजना, आयआरडीपी, डवाक्रा या योजनेअंतर्गत सहाय्य देण्यात येत असलेले दारिद्र्य रेषेखालील स्वयंरोजगारी आहेत याची खात्री करून घेण्यात यावी. तसेच **३०% स्वयं सहाय्यता गट/ स्वयंरोजगारी नव्याने सहभागी होतील याची दक्षता घेण्यात यावी. तसेच व्यावसायीक वितरक यांचा सहभाग होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.**

७. प्रदर्शनात सहाभागी होणाऱ्या स्वयंसहायता गटातील कारागिरांचे २ फोटो, त्यांच्या उत्पादनाची यादी व त्याची किंमत, पावती पुस्तक, तसेच पत्रव्यवहारासाठी आपल्या कार्यालयाचा पत्ता, दूरध्वनी क्र. फॅक्स क्र. ई-मेल इ. माहिती प्रदर्शनात सहभागी होणाऱ्या स्वयंसहायता गटाचे/ कारागिरांचे सोबत पाठवावी.

८. **<u>प्रदर्शनात सहभागी होणाऱ्या बचत गटाचे प्रतिनिधीत्व केवळ बचत गटातील सदस्य व्यक्तीच करेल.</u> बचत गटातील सदस्याव्यतिरिक्त इतर कोणतीही व्यक्ती प्रदर्शनास उपस्थित राहणार नाही, याची संपूर्ण खबरदारी संबंधित प्रकल्प संचालक यांनी घ्यावयाची आहे. तसेच एका**

**बचत गटाचे एकावेळी जास्तीत जास्त दोन पेक्षा अधिक सदस्य प्रदर्शनामध्ये सहभागी होणार नाहीत याची दक्षता घ्यावी.**

९. राज्य समन्वयक अधिकारी यांनी प्रदर्शन कालावधीत सहभागी बचत गटांसोबत **स्वतः** प्रदर्शन स्थळी उपस्थित राहून राज्याकरिता आरक्षित गाळे ताब्यात घेणे, तसेच बचत गटांची प्रवास व्यवस्था व निवास व अंतर्गत प्रवास व्यवस्था, यजमान राज्याने आयोजित केलेल्या बैठकामध्ये सहभागी होणे. इ. कामे करावयाची आहेत. तसेच **प्रदर्शनामध्ये राज्यातून सहभागी झालेल्या स्वयंसहाय्यता बचत गट / स्वयंरोजगारी यांची यादी, या प्रदर्शनावर झालेला एकूण खर्च, प्रदर्शनात झालेल्या एकूण विक्रीचा तपशीलवार अहवाल प्रदर्शन संपन्न झाल्यानंतर १० दिवसांच्या आत शासनास सादर करावयाचा आहे.**

१०. प्रादेशिक सरस प्रदर्शनावर येणारा खर्च संबंधित जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांनी स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार योजनेअंतर्गत देण्यात आलेल्या सुधारित मार्गदर्शक सुचनांनुसार **" Programme Infrastucture Para. No. 2.7 Other Admissible items of Expenditure under the programme Infrastucture (ii) Expenditure incurrred in organizing Fairs, Exhibitions and participation of Swarojgaries in fairs and exhibitions may be met from the funds available under the SGSY Programme Infrastucture."** अंतर्गत उपलब्ध असलेल्या निधीमधून **रु. २०,०००/- च्या मर्यादेत** भागविण्यात यावा. यापेक्षा जादा खर्च होणार नाही याची संबंधित प्रकल्प संचालक यांनी दक्षता घ्यावी.

**११. विभागीय सरस प्रदर्शनामध्ये सहभागी होणाऱ्या बचत गटातील स्वरोजगारींना प्रती बचत गट जास्तीत जास्त २ स्वरोजगारींना रु. १००/- प्रत्येकी प्रमाणे दैनंदिन भत्ता अनुज्ञेय राहील. प्रती बचत गट २ पेक्षा जास्त स्वरोजगारींना कोणत्याही परिस्थितीत दैनंदिन भत्ता देता येणार नाही.**

**१२. विभागीय सरस प्रदर्शनामध्ये सहभागी होणाऱ्या बचत गटातील स्वरोजगारींना प्रती बचत गट जास्तीत जास्त २ स्वरोजगारींना स्वरोजगारींच्या बचत गटाचे गाव ते प्रदर्शन स्थळ या दरम्यान प्रवासासाठी सर्वसाधारण सार्वजनीक बस किंवा रेल्वेच्या द्वितीय वर्ग शयनयान श्रेणीचे भाड्या इतका प्रवास भत्ता अनुज्ञेय राहील. प्रती बचत गट २ पेक्षा जास्त स्वरोजगारींना कोणत्याही परिस्थितीत प्रवासभत्ता देता येणार नाही.**

१३. प्रदर्शनामध्ये जिल्ह्यातून सहभागी होणाऱ्या बचत गटांची संख्या दोन पेक्षा जास्त असल्यास संबंधित जिल्ह्यातील एक विस्तार अधिकारी दर्जाचा अधिकारी सोबत पाठविता येईल.

१४. **प्रदर्शन कालावधीत प्रदर्शन स्थळी अनुपस्थित राहणे, बचत गटाव्यतिरिक्त इतर व्यक्तींना राज्या करिता आरक्षित गाळे देणे, प्रदर्शन स्थळी गैरवर्तन करणे इ. सारख्या तक्रारी प्राप्त झाल्यास त्याची सर्वस्वी जबाबदारी राज्य समन्वय अधिकारी यांची राहील. अशाप्रकारच्या तक्रारीमध्ये तथ्य आढळल्यास संबंधित राज्य समन्वय अधिकाऱ्यावर कारवाई करण्यात येईल.**

१५. **प्रदर्शन कालावधीत प्रदर्शन स्थळी राज्य समन्वय अधिकाऱ्याची पूर्णवेळ उपस्थिती व त्यांच्या कामकाजाची तपासणी करण्यासाठी राज्य शासनामार्फत अचानक भेट देण्यात येईल याची नोंद घ्यावी.** सबब, प्रदर्शन स्थळी उपस्थित राहून आपली जबाबदारी चोखपणे पार पाडण्याबाबत संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी राज्य समन्वयक अधिकाऱ्यास आवश्यक त्या सूचना द्याव्यात.

*-*-*-*-*-*-*